॥ ॐ श्रीपरमात्मने नमः ॥

# अठरा श्लोकी गीता

रचयिता - कै. गो. रा. मोघे १९२८

## अध्याय १ अर्जुनविषादयोग

वृत्त शार्दूलविक्रीडित (यति - १२,७)

गेले कौरव आणि पांडव रणीं वर्णी कथा संजय
ती ऐके धृतराष्ट्र उत्सुक मने वाटे तयां विस्मय
पाहे पार्थ रणी कुलक्षय घडे चित्ती विषादा धरी
युद्धा पासुनि होउनी विमुख तो टाकी धनुष्या तरी

## अध्याय २ सांख्ययोग

वृत्त शार्दूलविक्रीडित (यति - १२,७)

झाला अर्जुन शोकमग्न बघुनी वेदांत सांगे हरी
आत्मा शाश्वत देह नश्वर असे हे ओळखी अंतरी
घेई बाण-धनू करी समर तू कर्तव्य ते आचरी
वागे नि:स्पृह हर्ष शोक न धरी ज्ञानी जनांच्या परी

## अध्याय ३ कर्मयोग

वृत्त शिखरिणी (यति - ६,११)

अगा कर्माहूनी अधिक बरवे ज्ञान कथिसी
तरी का तू येथे मजकडुनि हिंसा करविसी?
वदे पार्था पै ते यदुपति करी कर्म नियते
फलेच्छा सांडोनी सहज मग नैष्कर्म्य घडते

## अध्याय ४ ज्ञानकर्मसंन्यासयोग

वृत्त शिखरिणी (यति ६,११)

हराया भूभारा अमित अवतारांसि धरितो

विनाशूनी दुष्टा सतत निजदासां सुखवितो
नियंता मी ऐसे समजुनि करी कर्म मजसी
समर्पी तू कर्मे मग तिळभरी विद्‌ध नससी

अध्याय ५ कर्मसंन्यासयोग

वृत्त शिखरिणी (यति ६,११ तथा ६,७,४)

करी सारी कर्मे सतत निरहंकार असुनी
त्यजी प्रेम द्‌वेषा धरुनि ममता जो निशिदिनी
तया चिंता नाही पुढिल अथवा मागिल मनी
खरा तो संन्यासी स्थिरमतिहि संकल्प सुटुनी

अध्याय ६ आत्मसंयमयोग

वृत्त शार्दूलविक्रीडित (यति - १२,७)

चित्ताचा सखया निरोध करणे हा योग मानी खरा
हा मी हा पर भेद हा मुळि नसे चित्ती कधी ज्या नरा
जो सप्रेम सदा भजे मज सदा जो सर्व भूतीं सम
ठेवी मद्‌गत चित्त त्याहुनि दुजा योगी नसे उत्तम

अध्याय ७ बुद्‌धियोग

वृत्त शार्दूलविक्रीडित (यति - १२,७)

माझ्या केवळ जाहली प्रकृतिने ही सृष्टि सारी असे
पृथ्वी माझि सुगंध मीच रस मी तोयात पार्था वसे
सर्वांतर्गत मी परी न मज ती ही गोष्ट मायाबळे
जे चित्ती मज चिन्तिती सतत ते तापत्रया वेगळे

अध्याय ८ अक्षरब्रह्मयोग

वृत्त शिखरिणी (यति ६,७,४)

सदा ध्याती मांते हृदयकमळिं जे स्थिर मनीं

तयां देहांती मी अमित सुख देतो हरि म्हणे
म्हणूनी पार्था तू निशिदिनि करी ध्यान भजन
मिळोनी मद्रूपी मग चुकविशी जन्म मरण
अध्याय ९ राजविद्याराजगुह्ययोग
वृत्त शार्दूलविक्रीडित (यति - १२,७)
भक्तीने जल पत्र पुष्प फल कीं काही दुजे अर्पिले
ते माते प्रिय तेवि जे नर सदा मत्किर्तनी रंगले
पार्था ते नर धन्य ज्या मुखि वसे मन्नाम-संकीर्तन
विष्णो कृष्ण मुकुंद माधव हरे गोविंद नारायण
अध्याय १० विभूतियोग
वृत्त स्रग्धरा (यति ७,७,७)
कोठे देवासि चिंतू जरि म्हणसि असे ऐक माझ्या विभूति
संक्षेपे अर्जुना मी तुज गुज कथितो मी असे सर्व भूती
मी धाता विष्णु मी शिव रवि निगमी साम मी विश्वरूप
माझी सर्वत्र सत्ता जगि असुनि असे दिव्य माझे स्वरूप
अध्याय ११ विश्वरूपदर्शनयोग
वृत्त **???** (यति ५,४,७::८,८)
पार्थ विनवि माधवासि विश्वरूप भेटवा
म्हणूनिया हरी धरी विकट रूप तेधवा
मांडिला अनर्थ थोर पंडुकुमर घाबरे
म्हणे पुनश्च दाखवा विभो स्वरूप गोजिरे
अध्याय १२ भक्तियोग
वृत्त पृथ्वी (यति २,६,३,६)
बरी सगुण भक्ति की भजन निर्गुणाचे बरे

पुसे विजय तैं तदा हरि वदे तया आदरे
असोत बहु योग ते तरिहि भक्तियोगाहुनी
नसेचि दुसरा असा सुलभ जो श्रमावाचुनी

अध्याय १३ क्षेत्रक्षेत्रज्ञविभागयोग

वृत्त स्रग्धरा (यति ७,७,७)

क्षेत्र क्षेत्रज्ञ दोन्ही कथुनि मग पुढे कृष्ण पार्थासि सांगे
ज्ञानी त्याते म्हणावा भजुनि मज कदा जो मदाने न वागे
तैसा जो भेद नेणे प्रकृति पुरुषिचा सर्व भूती समत्व
कर्माची त्यास बाधा तिळभर हि नसे पावला तो प्रभुत्व

अध्याय १४ गुणत्रयविभागयोग

वृत्त शार्दूलविक्रीडित (यति - १२,७)

पार्था मी जनिता तशीच जननी माया जगत् संतति
जीवा सत्व रजस्तम त्रिगुण हे स्वाभाविक व्यापिती
जो सप्रेम सदा भजे मज तसा जो सर्व भूती सम
ठेवी मद्‌गत चित्त त्याहुनि दुजा योगी नसे उत्तम

अध्याय १५ पुरुषोत्तमयोग

वृत्त शार्दूलविक्रीडित (यति - १२,७)

ऊर्ध्वी मूळ तळीं अपार पसरे अश्वत्थ संसार हा
छेदाया दृढ शस्त्र एकचि तया नि:संगता सर्वथा
ऐसे ओळखुनी क्षराक्षर मला जे पूजिती भारता
ते होती कृतकृत्य गुह्य कळुनी पावोनि सर्वज्ञता

अध्याय १६ दैवासुरसंपद्‌विभागयोग

वृत्त शार्दूलविक्रीडित (यति - १२,७)

दैवी प्रकृति लक्षणें मनि धरी धैर्य क्षमा प्रौढता

चित्तस्वास्थ्य दया ऋजुत्व मृदुता सत्यादि बा भारता
आता दंभ असत्य मत्सरपणा वर्मी परां बोलणें
काम क्रोध अहंकृती त्यज सदा ही आसुरी लक्षणें

अध्याय १७ श्रद्धात्रयविभागयोग

वृत्त **???** (यति - ६,६,१०)

सत्व रजस्तम तीन गुणापरि श्रद्धा तपमख दान असे
त्रिविध अङ्ग ही निज बीजापरि आवडि त्यावरि दृढ बैसे
उत्तम, मध्यम, अधम जाण ही क्रमे तयातुनि सत्व धरी
मग ओम्-तत्-सत् वदुनि धनंजय ब्रम्ह समर्पण कर्म करी

अध्याय १८ मोक्षसंन्यासयोग

वृत्त **???** (यति - ५,५,१२ तथा ६,६,६,४)

त्यजू पाहसी युद्ध परी ते प्रकृति करविल तुजकडुनी
तरि वद पार्था परिसुनि गीता रुचते ममता का अजुनी
मग तो वदला मोह निरसला संशय नुरला खरोखरी
कृतार्थ झालो प्रसाद हा तव वचन तुझे मज मान्य हरी

॥ श्री कृष्णार्पणमस्तु ॥

टीप - ह्या गीतेचा यूट्यूब व्हिडियो ⇒
**https://youtu.be/zYUEuVRwjuQ**